मालवणी मालाड, मुंबई येथील विषारी
दारुकांडाची चौकशी करणे तसेच अशा
घटनेची पुनरावृत्ती होऊ नये यासाठी
उपाययोजना सूचविणे याकरीता अपर मुख्य
सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली चौकशी
समिती गठित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमआयएस २०१५ / प्र.क्र. ९८१ / पोल -११**
गृह विभाग, दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई ३२.
दिनांक - १० जुलै २०१५.

**प्रस्तावना :**

मालवणी मालाड, मुंबई येथील विषारी दारुमुळे १०० पेक्षा जास्त व्यक्तींचा मृत्यू झाल्यामुळे सदर विषारी दारु कांडाची चौकशी करण्यासाठी व अशा घटनांची पुनरावृत्ती होऊ नये यासाठी उपाययोजना करण्यासाठी मा. अपर मुख्य सचिव (गृह) यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती गठीत करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासन आता या शासन निर्णयाव्दारे मालवणी मालाड, मुंबई येथील विषारी दारुमुळे १०० पेक्षा जास्त व्यक्तींचा मृत्यू झाल्यामुळे सदर विषारी दारु कांडाची चौकशी करण्यासाठी व अशा घटनांची पुनरावृत्ती होऊ नये म्हणून करावयाच्या उपाययोजना संदर्भात शिफारशी करण्यासाठी पुढीलप्रमाणे एक समिती गठीत करत आहे.

समितीची रचना.

| | | | |
|---|---|---|---|
| (१) | श्री. के. पी. बक्षी, अपर मुख्य सचिव, गृह विभाग. | - | अध्यक्ष. |
| (२) | प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय. | - | सदस्य. |
| (३) | प्रधान सचिव, महसूल, मंत्रालय. | - | सदस्य. |
| (४) | प्रधान सचिव, समाज कल्याण | - | सदस्य. |
| (५) | प्रधान सचिव, राज्य उत्पादन शुल्क विभाग, मंत्रालय | - | सदस्य सचिव. |

**समितीची कार्ये :-**

सदर समिती ही मालवणी मालाड, मुंबई येथील विषारी दारुकांडाची सखोल चौकशी करेल तसेच अशा घटनेची पुनरावृत्ती होऊ नये यासाठी उपाययोजनाबाबत शिफारशी करेल. सदर समितीने आपला अहवाल शासनास ३ महिन्यात सादर करणे अपेक्षित आहे.

वरील समितीस कोणत्याही व्यक्तिस अथावा शासकीय अधिकारी / कर्मचारी यांना कधीही पाचारण करण्याचे अधिकार राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७१०१७५४३२५४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Mahadeo Khade

Digitally signed by Suresh Mahadeo Khade
DN: CN = Suresh Mahadeo Khade, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.07.10 12:39:10 +05'30'

**( सुरेश खाडे )**
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रत,

(१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
(२) पोलीस आयुक्त, मुंबई.
(३) जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर जिल्हा.
(४) निवडनस्ती, पोल ११.